**प्रशासकीय मान्यता**
**ठाणे येथील जिल्हा न्यायालयाच्या अस्तित्वात असलेल्या इमारतीमध्ये उद्वाहन बसविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीसीबी-११२३/प्र.क्र.७४/का-१३**
मादाम कामाम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० ऑगस्ट २०२३

**पहा :-**

प्रबंधक (निरिक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र.बी(डब्ल्यू) ६०४०/ १९७८ (१३६)/१२९५/२८४०५, दिनाक १५ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

ठाणे येथील जिल्हा न्यायालयाच्या अस्तित्वात असलेल्या इमारतीमध्ये उद्वाहन बसविण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

ठाणे येथील जिल्हा न्यायालयाच्या अस्तित्वात असलेल्या इमारतीमध्ये उद्वाहन बसविण्याकरिता रु.४८,७६,०००/- (रुपये अठ्ठेचाळीस लक्ष श्याहत्तर हजार पाचशे फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम रुपयांत |
|---|---|---|
| १ | स्थापत्य काम | १८,८५,४०३/- |
| २ | उद्वाहन केबिन | १८,६८,२७७/- |
| ३ | भाववाढ | १,५०,१४७/- |
| ४ | कामगार विमा | ३७,५३७/- |
| ५ | वस्तू नि सेवा कर | ६,७१,८५२/- |
| ६ | आर्किटेक चार्जेस, आरसीसी नकाशा इ. | ७५,०७४/- |
| ७ | आकस्मिकता निधी | १,८७,६८६/- |
| | एकूण | ४८,७५,९७६/- |
| | म्हणजेच | ४८,७६,०००/- |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) उद्वावहन बसविण्याच्या कामास नमुना नकाशा, मांडणी तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेवूनच सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३ / प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) काम सुरु करण्यापूर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था / प्राधीकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

५) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी "मागणी क्र. एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम-कार्यक्रमांतर्गत-(०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), (०३)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम),५३- मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-केंद्र हिस्सा) (२१)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३- मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशिर्षाखाली मंजूर नियतव्ययातून खर्ची टाकण्यात यावा. मात्र अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ११८/२०२३/इमा-२, दिनांक ४ जुलै, २०२३ व सार्वजनिक बांधकाम विभाग, परिपत्रक, क्र.संकिर्ण-२०१९/ प्र.क्र.१०/ इमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये मा. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, ठाणे यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार तसेच, नियोजन विभाग, परिपत्रक, क्र.ससमा-२०१०/प्र.क्र.४८/भाग-१/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०८१०१७४९५८५०१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed0906
2245cb9e042be5b12e5aa482fc17,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A1242248
2D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0,
cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2023.08.10 17:51:00 +05'30'

**( विलास व्ही. गायकवाड )**
**विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
४) प्रबंधक बी (डब्ल्यू ) शाखा, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
५) मा.अतिरिक्त प्रधान न्यायाधीश, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन, मुंबई व नागपूर,
७) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अंधेरी, ठाणे.
८) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
९) उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, ठाणे.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
११) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२) कक्ष अधिकारी (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) कक्ष अधिकारी (१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६) कक्ष अधिकारी, का. ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७) निवड नस्ती/संग्रहार्थ.